राज्यातील उत्पादित होणारे पिशवीबंद दूध वगळून उर्वरित ३.२/८.३ गाय दूध व त्यापेक्षा अधिक गुणप्रतीच्या दुध रुपांतरण अनुदान योजनेस मुदतवाढ..

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांक लवेसू २०१८/प्र.क्र. ८ /पदुम-८:

मंत्रालय (विस्तार), मुंबई ४०० ०३२

तारीख : १७ नोव्हेंबर, २०१८

वाचा :- १) शासन समक्रमांकीत शासन निर्णय दिनांक २० जुलै, २०१८.

२) शासन समक्रमांकीत शासन निर्णय दिनांक ३१ जुलै, २०१८.

३) आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास यांचे पत्र क्रमांक आदुवि९/दूधदरकायदा/नियोजन / २०१८/७३/१५९१, दिनांक २०.१०.२०१८.

**प्रस्तावना :-**

शासनाने संदर्भाधीन क्रमांक १ व २ येथील शासन निर्णयांन्वये दूध भुकटी व द्रवरुप दूधाची निर्यात करण्यासाठी सहकारी व खाजगी दूध भुकटी प्रकल्पांना अनुक्रमे रुपये ५०/- प्रति किलो आणि रु. ५/- इतके प्रति लिटर प्रोत्साहनपर अनुदान काही अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजूर केले आहे. सदर प्रोत्साहनपर अनुदानाची योजना दिनांक १९ जानेवारी, २०१९ पर्यंत अंमलात राहणार आहे. याच शासन निर्णयान्वये शासनाने राज्यातील उत्पादित होणारे पिशवीबंद दूध वगळून उर्वरित ३.२/८.३ गाय दूध व त्यापेक्षा अधिक गुणप्रतीच्या दूधासाठी रुपये ५/- प्रति लिटर अनुदान अनुज्ञेय केले होते. सदर योजना दिनांक १ ऑगस्ट, २०१८ ते दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१८ या कालावधीत राबविण्यात आली आहे. सदर योजनेस मिळणारा प्रतिसाद लक्षात घेऊन आवश्यकतेनुसार सदर योजना पुढे सुरु ठेवण्याबाबत स्वतंत्रपणे निर्णय घेण्यात येईल, अशी भूमिका सदर शासन निर्णयान्वये घेण्यात आली होती.

२. सदर योजनेच्या प्रतिसादाबाबत संदर्भाधीन क्रमांक ३ अन्वये आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी शासनास सकारात्मक अहवाल सादर केला असून, या योजनेमुळे शेतकऱ्यांमध्ये समाधानाचे वातावरण दिसत असल्याचे आपल्या अहवालात नमूद केले आहे. राज्यात सध्या दुष्काळसदृष्य परिस्थिती निर्माण झाली आहे. दूध उत्पादक शेतकऱ्यांकरीता शेतीबरोबर महत्वाचा जोडधंदा म्हणून दुग्धव्यवसायाकडे पाहिले जाते. राज्यात सध्या निर्माण झालेली दुष्काळसदृष्य परिस्थिती लक्षात घेता, दूध उत्पादक शेतकऱ्यांच्या हितास्तव राज्यातील उत्पादित होणारे पिशवीबंद दूध वगळून उर्वरित ३.२/८.३ गाय दूध व त्यापेक्षा अधिक गुणप्रतीच्या दूधासाठी रुपये ५/- प्रति लिटर अनुदान योजना दिनांक ३१ ऑक्टोबर, २०१८ या दिनांकानंतरही पुढे सुरु ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय :

शासन या निर्णयान्वये संदर्भाधीन क्रमांक १ व २ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या योजनेतील “ब” येथील योजनेस मुदतवाढ देत असून, सदर योजना पूर्वलक्षी प्रभावाने पुढील ३ महिन्यांकरीता म्हणजेच दिनांक १ नोव्हेंबर, २०१८ ते दिनांक ३१ जानेवारी, २०१९ पर्यंत कार्यान्वित राहील. यासंदर्भातील शासन निर्णय क्रमांक १ व २ येथील उर्वरित अटी व शर्ती कायम राहतील.

२. उपरोक्त योजनेच्या अनुदानावरील खर्च हा सन २०१८-१९ करीता शासकीय दूध योजनांच्या मागणी क्र.डी-५, २४०४ दुग्धव्यवसाय विकास याखाली असलेल्या २९ दूध खरेदी या उद्दिष्टाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. आयुक्त, दुग्धव्यवसाय यांनी सदर योजनेकरीता निधीच्या आवश्यकतेप्रमाणे आकस्मिकता निधीचा प्रस्ताव शासनास सादर करण्याची कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१११७१७३८२१८८०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Anoop Kumar

Digitally signed by Anoop Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture and ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=257f78acf3ca20d9e91d7a73a76aa0240463e4aafdd4d13de68918dc20bad8e6, serialNumber=1c2ee608849bdb812849b6c8878f95607059b530ff717c8e39c09d06b394e02b, cn=Anoop Kumar
Date: 2018.11.17 17:43:47 +05'30'

(अनूप कूमार )
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.राज्यपाल,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री,महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव
३. मा.मंत्री (पदुम)/मा.राज्यमंत्री (पदुम) यांचे खाजगी सचिव
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
११. सचिव, महिला व बाल कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अपर मुख्य सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१३. सचिव (पदुम) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. महालेखापाल, अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/नागपूर
१५. संचालक, लेखा व अनुज्ञेयता, मुंबई
१६. आयुक्त, दुग्धव्यवसाय विकास, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी दूध महासंघ, गोरेगाव, मुंबई
१८. प्रादेशिक दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
१९. जिल्हा दुग्धव्यवसाय विकास अधिकारी (सर्व)
२०. निवडनस्ती.